शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे येथील जागेत ऑलिंपिक भवन बांधकामासंदर्भात कार्यान्वयन यंत्रणा निश्चित करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- क्रीडासु-३०२०/प्र.क्र.३५/कीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०२ ऑगस्ट, २०२३

वाचा:-

१) समक्रमांकाचा शासन निर्णय दि.२७ मार्च,२०२०.
२ ) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. क्रीडासू-३०२०/प्र.क्र. ४३/क्रीयुसे-१, दि. २७ मार्च,२०२०.
३ ) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. पुमाप्र-३०२०/प्र.क्र. २१८/क्रीयुसे-१, दि. १४ जानेवारी,२०२१
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. पुमाप्र-३०२०/प्र.क्र. २१८/क्रीयुसे-१, दि. २५ मार्च,२०२१
५) शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे संदर्भातील उच्च स्तर धोरण समितीची दि.२२ जून,२०२३ रोजीची बैठक.
६) समक्रमांकाचे दि.३० जून,२०२३ रोजीचे शासन पत्र.
७) मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांच्या अध्यक्षतेखालील दि.१७.७.२०२३ रोजीची आढावा बैठक

प्रस्तावना:-

शिवछत्रपती क्रीडा संकुलातील जागेमध्ये ऑलिंपिक भवन उभारणी करण्यासंदर्भातील रुपये ४४.७० कोटी रकमेच्या प्रकल्पास मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दि.०४ मार्च, २०२० रोजीच्या बैठकीत मान्यता प्रदान केलेली आहे. त्यानुसार संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय दि. २७ मार्च, २०२० अन्वये ऑलम्पिक भवन इमारतीच्या बांधकामास अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान देण्यात आली आहे. तसेच या अनुषंगाने संदर्भ क्र.२ ते ४ येथील शासन निर्णयांन्वये एकूण रू.४४७०.०० लक्ष (रू.४४ कोटी,७० लक्ष) एवढा निधी वितरित केलेला आहे. या अनुषंगाने संदर्भ क्र.५ व ६ येथील बैठकांमध्ये प्रकल्पाचा आढावा घेण्यात आला. सदर बैठकांमधील सूचना व निर्देश विचारात घेऊन सदर ऑलिंपिक भवन बांधकामाकरिता कार्यान्वयन यंत्रणा निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

शिवछत्रपती क्रीडा संकुलातील जागेमध्ये ऑलिंपिक भवन या प्रकल्पाचे बांधकाम करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागास कार्यान्वयन यंत्रणा (Implementing Agency) म्हणून नियुक्त करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर मान्यता खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय दि.२७.३.२०२०, संदर्भ क्र.२ ते ४ येथील शासन निर्णय अनुक्रमे दि.२७.३.२०२०,दि.१४.१.२०२१ व दि.२५.३.२०२१ मधील सर्व तरतुदी तसेच अटी व शर्ती लागू राहतील व त्यांचे पालन करणे आवश्यक राहील.

२) संदर्भ क्र.५ व ६ अनुसार आयुक्त, क्रीडा व युवक व सेवा,पुणे यांच्या कडून प्रकल्पासंदर्भात अंदाजपत्रके व आराखडे सादर करण्यात येणार असून सदर आराखडे व अंदाजपत्रके विहीत स्तरावर अंतिम झाल्यानंतर प्रकल्पाच्या बांधकामासंदर्भात पुढील कार्यवाही करण्यात येईल.

३) प्रकल्पाच्या कामाच्या प्रगतीनुसार निधी वितरणाबाबत कार्यवाही करण्यात यावी. तसेच कामाचा प्रगती अहवाल व वितरित निधीबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे वेळोवेळी शासनास सादर करणे आवश्यक राहील.

४) यासंदर्भातील सर्व वित्तीय व अन्य संबधित नियमाधिन तरतुदींचे अनुपालन करणे आवश्यक राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०२३०८०२१४२८३४३८२१** असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2023.08.02 19:10:55 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राज्यपालांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
५) मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.

७) सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
८) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
९) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१०) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
११) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१२) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक
१३) मा. महालेखापाल (लेखाव अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१४) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५) सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा,पुणे
१६) वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१७) नियोजन विभाग (कार्यासन-१४७१) मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती (क्रीयुसे-१)